**महिला व बाल विकास (खुद्द) विभागाचे नूतनीकरण व सचिव महोदयांचा दालनाच्या नुतनीकरणासाठी करण्यात आलेल्या स्थापत्यविषयक कामावरील खर्चासाठी (२२५१ ०४३६) या लेखाशिर्षा अंतर्गत १३-कार्यालयीन खर्च या उद्दिष्टामधून निधी वितरित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. आस्था-२०२१/प्र.क्र.११३/का-०१**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक: १३ मे, २०२४

**वाचा :-** १) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र. शाकाजा-११२१/प्र.क्र.६७/२०२१/२२, दि. २४/१२/२०२१

२) महिला व बाल विकास विभाग शासन निर्णय क क्र-आस्था-२०२१/ प्र.क्र.११३/का-०१, दि. ३१/०५/२०२२ व दि. २२.८.२०२३ रोजीचे प्रशासकीय मान्यता आदेश

३) महिला व बाल विकास विभाग शासन निर्णय क क्र-आस्था-२०२१/प्र.क्र.११३/ का-०१, दि. १६/०१/२०२३, दि. ५.२.२०२४ व दि. २८.०३.२०२४ रोजीचे निधी वितरण आदेश

**प्रस्तावना:-**

महिला व बाल विकास विभाग आणि पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग या दोन्ही विभागाच्या संगनमताने नवीन शासन भवन, ३ रा मजला (पूर्व बाजू) येथील पाणी पुरवठा विभागाची १८७३ चौ. फूट जागा गो.ते. रुग्णालयातील ८ व्या मजल्यावरील २००० चौ. फूट जागेत कार्यरत असलेल्या महिला व बाल विकास विभागाच्या अखत्यारीतील राजमाता जिजाऊ माता बाल आरोग्य आणि पोषण अभियान यांच्या कार्यालयासाठी गो.ते. रुग्णालयातील जागा आंतरबदलाने सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क. १ येथील शासन निर्णयान्वये या विभागास वाटप करण्यात आलेली आहे.

२. सदर जागेसह विभागाच्या नुतनीकरणासाठी सार्वजनिक बांधकाम विभागाकडून प्राप्त अंदाजपत्रकांनुसार स्थापत्य व फर्निचरच्या कामाकरीता संदर्भाधीन क्र. २ येथील शासन निर्णया अन्वये स्थापत्य कामासाठी एकूण रु. १८५,६३,८००/- व विद्युतीकरण्याच्या कामकाजासाठी रु. ४३,४६,५३९/- असे एकूण २,२९,१०,३३९/- इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास संदर्भ क. २ येथील दि. ३१.०५.२०२२ व दि. २८.८.२०२३ च्या शासन निर्णयांन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. तसेच संदर्भ क्र. ३ येथील दि.१६/०१/२०२३ च्या शासन निर्णयान्वये रु. ३२,८६,९२९/-,

दि. ५.२.२०२४ च्या शासन निर्णयान्वये ८७,७२,०७५/- व दि. २८.३.२०२३ च्या शासन निर्णयान्वये रु. ९,४८,७३२/- अशी एकूण रु. १,३०,०७,७३६/- एवढी रक्कम सार्वजनिक बांधकाम विभागाच्या स्थापत्य व विद्युत विभागास अदा करण्यात आली आहे. आता सार्वजनिक बांधकाम विभाग, स्थापत्य यांना उर्वरित देय असलेल्या रु. ९९,०२,६०३ /- या रकमेपैकी रू. ५०,००,०००/- इतकी रक्कम अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महिला व बाल विकास विभाग (खुद्द) व विभागाच्या अखत्यारितील राजमाता जिजाऊ माता बाल आरोग्य आणि पोषण अभियान यांच्या कार्यालयाचे नूतनीकरण व मा. सचिव, महिला व बाल विकास विभाग यांच्या दालनामध्ये करण्यात आलेल्या नुतनीकरणासाठी झालेल्या खर्चापैकी प्रलंबित असलेल्या रु. ९९,०२,६०३/- एवढ्या रकमेपैकी सार्वजनिक बांधकाम विभाग (स्थापत्य) यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे (BEAMS) त्यांच्या कार्यालयाच्या कोषागार सांकेतांकावर खालीलप्रमाणे रक्कम वितरित करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र | विभाग/कार्यालय | कोषागार सांकेतांक तपशिल | रक्कम रूपये |
|---|---|---|---|
| १ | कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग (स्थापत्य) मुंबई. | BDS System on treasury Code ७१०१ DDO Code No. ९०३६९६ & User ID ७१०१९०३६९६ Executive Engineer,PWD, Mumbai | रू.५०,००,०००/- |
| एकूण = (अक्षरी रूपये पन्नास लाख फक्त) | | | रू.५०,००,०००/- |

२. या प्रयोजनार्थ होणारा खर्च मागणी क्रमांक एक्स-२, २२५१ सचिवालय सामाजिक सेवा, ०९० सचिवालय (०१) (०१) महिला व बाल विकास विभाग (२२५१०४३६) १३- कार्यालयीन खर्च या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून सन २०२४-२५ या वित्तीय वर्षासाठी मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

३. या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन देण्यात येत असलेला निधी ज्या कामासाठी उपलब्ध करुन देण्यात येत आहे. त्या कामासाठीच खर्च होईल, याची दक्षता कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभागाने घ्यावी.

४. सदर शासन निर्णय वित्त विभाग क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम भाग-२ दि. २०/०९/२०१९ च्या परिशिष्ट वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-१ उपविभाग ५ अन्वये

सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील अनु. क्र.१ नियम-१३४ (१) अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०५१३१४४८२९५३३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VILAS RAMDAS THAKUR

Digitally signed by VILAS RAMDAS THAKUR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=cb156fb408217396128e8dcaeed3f6fa70d9fd209eb9efc83bdd68b308614534, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C8B1E52C5C4F922AB6EB7A0B44101C838AEA34F29FBFF0AEBE9D85C3DE3468C2, cn=VILAS RAMDAS THAKUR
Date: 2024.05.13 15:01:39 +05'30'

**( वि.रा. ठाकूर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,** अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (रोखशाखेमार्फत)

**प्रतः-**

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरीक्षा, मुंबई.
२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
३. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई.
४. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, इलाखा शहर विभाग, मुंबई.
५. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, इलाखा शहर विभाग, मुंबई,
६. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग (स्थापत्य), मुंबई.
७. शाखा अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मनोरा आमदार निवास, मुंबई
८. उपसचिव (श्री. ठाकूर), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
९. वित्त विभाग (अर्थ-७/ व्यय-६) मंत्रालय, मुंबई
१०. कक्ष अधिकारी का-४ (अर्थसंकल्प शाखा) महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. कक्ष अधिकारी, रोखशाखा, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. निवडनस्ती.